विभागीय आयुक्त नाशिक यांच्या अध्यक्षतेखाली विशेष तपास पथक (SIT) स्थापन करण्याबाबत.



**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. लवेसू-१८५०/१२२२/प्र.क्र.१५५/ख-२/शिकाना**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २८ फेब्रुवारी, २०२३.

**प्रस्तावना:**

महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन २०२२ च्या चतुर्थ (हिवाळी) अधिवेशनामध्ये श्री. चंद्रकांत (भाऊ) निंबाजी पाटील, विधानसभा सदस्य यांनी महाराष्ट्र विधानसभा नियम १०५ अन्वये उपस्थित केलेल्या लक्षवेधी सूचना क्र.१८५० च्या अनुषंगाने विधानसभा सभागृहामध्ये दि.२६.१२.२०२२ रोजी चर्चा करण्यात आली.

सदर लक्षवेधी सूचनेच्या चर्चेच्या वेळी मा. मंत्री (महसूल) यांनी "अध्यक्ष महोदय, सन्माननीय सदस्यांचा आग्रह आहे व यामधील भ्रष्टाचाराची व्याप्ती देखील मोठी आहे. या प्रकरणी शासनाचा मोठ्या प्रमाणात महसूल बुडालेला असल्याने व सन्माननीय सदस्यांची मागणी लक्षात घेता या प्रकरणाची SIT मार्फत चौकशी करण्यात येईल" असे आश्वासन विधानमंडळ सभागृहात दिले आहे. त्याअनुषंगाने प्रस्तुत प्रकरणी विशेष तपास पथक (SIT) स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

मा. मंत्री (महसूल) यांनी विधानसभा सभागृहामध्ये उपरोक्तप्रमाणे दिलेल्या आश्वासनाच्या अनुषंगाने सखोल चौकशी करण्याकरीता विभागीय आयुक्त नाशिक यांच्या अध्यक्षतेखाली विशेष तपास पथक (SIT) स्थापन करण्यात येत आहे.

(अ) विभागीय आयुक्त, नाशिक-विशेष तपास पथकाचे प्रमुख
सदर तपास पथकामध्ये निमंत्रीत सदस्य म्हणून तज्ञ व्यक्तींना बोलावण्याचे अधिकार विशेष तपास पथकाचे प्रमुख यांना राहतील.

(आ) कार्यकक्षा-सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील. त्यात वाढ करण्याचे अधिकार शासनास राहतील.

(I) मौजे सातोड, ता. मुक्ताईनगर येथील गट नंबर २२५/२/३, २२५/३/२, २२५/२/१, २२५/१/१, २२५/१/२ या गटाबाबत परवानगी देण्यात आलेले अकृषीक प्रयोजन व त्या प्रयोजनामध्ये करण्यात आलेले बदल.

(II) सदर गटातून राष्ट्रीय महामार्ग क्र.६ बाबत देण्यात आलेल्या परवानग्या व सदर परवानगीच्या अनुषंगाने करण्यात आलेले गौण खनिजाचे उत्खनन याची तपासणी.

(III) अवैध उत्खनन व वाहतूक सदर गटातून करण्यात येवून शासनाचे झालेले नुकसान.

(IV) मृद व जलसंधारण विभागाच्या दि.२९.११.२०१७ च्या शासन निर्णयाद्वारे परवानगी देण्यात येताना अनियमीतता झाली किंवा कसे?.

(V) सदर गटामधून राष्ट्रीय महामार्ग क्र.६ यांच्या कामासाठी विक्री केलेल्या गौण खनिजाबाबतचा तपास.

२. उपरोक्त विशेष तपास पथकाने चौकशीची कार्यवाही तीन महिन्यात पुर्ण करून त्याप्रमाणे अहवाल सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संकेतांक २०२३०२२८१८०५२२७३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH VITHOBA GAWDE

Digitally signed by SANTOSH VITHOBA GAWDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=8e111cd4ca87dbe700ee92d0e1b3fd993c8b0952a368e400ed2af72cb5dd990c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CA6A91A5EFCF2DDE6274B385D86F23914275B4E2B1125F6E74E6A1FAC7106C22, cn=SANTOSH VITHOBA GAWDE
Date: 2023.02.28 18:09:37 +05'30'

**( संतोष गावडे )**

उप सचिव, महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
४. मुंबई मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधानपरिषद) महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. सर्व सन्माननीय संसद, विधानसभा, विधानपरीषद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
६. मा. मंत्री (महसूल) यांचे खासगी सचिव.
७. मा. मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहायक.
८. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव.
९. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय विधानभवन, मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, यांचे विशेष कार्य अधिकारी
११. निवडनस्ती (ख-२ कार्यासन).